उपसंचालक आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांचे अधिपत्याखालील उपजिल्हा रुग्णालय सावंतवाडी व कणकवली या दोन रुग्णालयामधील ट्रामा केअर युनिट मधील एकुण १८अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२२/प्र.क्र.१३१/आरोग्य-४,

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक : २७ एप्रिल, २०२२.

वाचा :-

१) सार्वजनिक आरोग्य विभागाचा शासन निर्णय क्रमांक : अपदे-२०२१/प्र.क्र.११६/आरोग्य-४, दि.२८/०९/२०२१.
२) वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.२२.०२.२०२२.
३) उपसंचालक, आरोग्य सेवा कोल्हापूर मंडळ, यांचे पत्र क्रमांक- उसंआसे/ट्रमा केअर युनिट/४२१३-१७, दि.१४.०३.२०२२.

शासन निर्णय :-

उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ,कोल्हापूर यांनी त्यांच्या संदर्भ क्र ३, दि. १४/०३/२०२२ च्या पत्रान्वये यांच्या अधिपत्याखालील उपजिल्हा रुग्णालय, सावंतवाडी, जि.सिंधुदुर्ग व उपजिल्हा रुग्णालय कणकवली, जि.सिंधुदुर्ग या दोन रुग्णालयामधील ट्रामा केअर युनिट मधील एकूण १८ अस्थायी पदांना मुदवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. सदर शासन निर्णयासोबत जोडलेल्या "**परिशिष्ट-अ**" मध्ये नमूद करण्यात आलेल्या उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, यांच्या अधिपत्याखालील आरोग्य संस्थांमधील १८ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर अस्थायी पदांचे वेतन पुढील लेखाशीर्षामध्ये खर्ची टाकण्यात यावे आणि हा खर्च सन २०२२-२०२३ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा:-

| लेखाशिर्ष |
|---|
| मागणी क्रमांक आर -१ मुख्य लेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०१) (४५) ट्रामा केअर युनिटची स्थापना, महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा (अनिवार्य), (२२१० जी २९८)" |

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २२.०२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर पदांना यापुढील कालावधीकरीता मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना, यासोबतच्या "परिशिष्ट-अ" मधील तक्यात प्रत्येक अरोग्य संस्थेचे नाव, एकूण मंजूर पदे, स्थायी पदे व अस्थाची पदे (तपशीलवार माहिती) याबाबतच्या तपशिलासह शासनास सादर करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०७१३३७५३५४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SACHIN SHAMKANT DESAI

Digitally signed by SACHIN SHAMKANT DESAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=52275339d48b6fd35ef523ecd953ba59cbb2b2b4d4413dff8b3f2fb17710505f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6FF04EBFFAB4F962AD757B0E36E3A96AB5DB4421F6C9568763153DEA139498B2, cn=SACHIN SHAMKANT DESAI
Date: 2022.04.27 15:13:25 +05'30'

**( सचिन देसाई )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.अपर मुख्य सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
२. मा.प्रधान सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
३. महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई /नागपूर.
४. आयुक्त,आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
६. सहसंचालक,आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
७. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.
८. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
९. जिल्हा शल्य चिकित्सक ,जिल्हा रुग्णालय,सिंधुदुर्ग
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग
११. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव / कार्यासन अधिकारी, (सेवा-१/सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प/ आरोग्य-३,आरोग्य ३-अ) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,मुंबई.
१३.निवडनस्ती (आरोग्य-४)

## “परिशिष्ट-अ”

(सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक- अपदे-२०२२/प्र.क्र.१३१/आरोग्य-४,

दिनांक - २७ एप्रिल, २०२२ सोबतचे विवरणपत्र )

| अ. क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | एकूण मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|
| ०१ | **उपजिल्हा रुग्णालय, कणकवली,जि.सिंधुदुर्ग येथील ट्रामा केअर युनिट** | ०९ | ० | अस्थिव्यंग शल्यचिकित्सक, वर्ग २ (१ पद)<br>बधिरीकरण शास्त्रज्ञ, वर्ग २ (२ पदे)<br>वैद्यकीय अधिकारी,गट -अ (२पदे)<br>परिसेविका, वर्ग ३ (१ पद)<br>अधिपरिचारिका, वर्ग ३ (३ पदे) |
| | | ०९ | ० | **०९ अस्थायी पदे** |
| ०२ | **उपजिल्हा रुग्णालय, सावंतवाडी,जि.सिंधुदुर्ग येथील ट्रामा केअर युनिट** | ०९ | ० | अस्थिव्यंग शल्यचिकित्सक, वर्ग २ (१ पद)<br>बधिरीकरण शास्त्रज्ञ, वर्ग २ (२ पदे)<br>वैद्यकीय अधिकारी, वर्ग २ (२पदे)<br>परिसेविका, वर्ग ३ (१ पद)<br>अधिपरिचारिका, वर्ग ३ (३ पदे) |
| | | ०९ | ० | **०९ अस्थायी पदे** |